वैमानिकांना उजळणी प्रशिक्षणासाठी पाठविणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. विचासं-१११७/१/प्र.क्र.१६/२८-अ,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ३२.
दिनांक: १३ फेब्रुवारी, २०१७.

**वाचा :** १) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.विचासं-१११३/ प्र.क्र.१३७/ २८-अ, दि.९ जुलै, २०१३ अन्वये निर्गमित करण्यात आलेले मा.शक्ती प्रदत्त समितीच्या दि.२५.०६.२०१३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
२) विमानचालन संचालनालयाचे पत्र क्र.डीए/ एडीएम/ ५२/ २०१७, दि.१२ जानेवारी, २०१७.

**प्रस्तावना :**

राज्य शासनाच्या विमानचालन संचालनालयातंर्गत हेलिकॉप्टरच्या वैमानिकांना डी.जी.सी.ए.च्या नियमानुसार दरवर्षी हवाई वाहनाचे उजळणी प्रशिक्षण घेणे आवश्यक करण्यात आले आहे. त्यानुसार विमानचालन संचालनालयातील तीन वैमानिकांना हेलिकॉप्टरच्या उजळणी प्रशिक्षणासाठी परदेशी पाठविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

विमानचालन संचालनालयातील खालील नमुद वैमानिकांना त्यांच्या नावापुढे नमुद केलेल्या कालावधीमध्ये हेलिकॉप्टरच्या उजळणी प्रशिक्षणासाठी परदेशी जाण्यासाठी शासनाची मान्यता देण्यात येत आहे :

| अ.क्र. | वैमानिकाचे नाव व पदनाम | प्रशिक्षणाचा दिनांक | प्रशिक्षणाचा कालावधी | प्रशिक्षणाचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | कॅ.संजय कर्वे, संचालक तथा मुख्य वैमानिक | २७.०६.२०१७ | १४ | CAE, Morris Town, New Jersy, U.S.A. |
| २ | कॅ.महेंद्र दळवी, वरिष्ठ वैमानिक | १७.०६.२०१७ | १४ | CAE, Morris Town, New Jersy, U.S.A. |
| ३ | कॅ.मोहित शर्मा, सह वैमानिक | ०६.०९.२०१७ | १४ | CAE, Morris Town, New Jersy, U.S.A. |

२. उपरोक्त प्रशिक्षणासाठीच्या खर्चाचे विस्तृत परिशिष्ट १ यासोबत जोडण्यात आले आहे.

३. उक्त प्रशिक्षणासाठी होणारा खर्च $४६५०० हा पुढील लेखाशीर्षाखालील सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्रमांक ए-४**
**“२०७०-इतर प्रशासनिक सेवा**
**(००) (११४) परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण**
**(००) (०२) विमान चालन सल्लागार, महाराष्ट्र शासन”**
**(२०७० ०१५६)-५० इतर खर्च**

आणि उक्त प्रशिक्षणासाठी वैमानिकांचा निवास खर्च, दैनिक भत्ता खर्च (डॉलरमध्ये) आणि प्रवास खर्च (रुपयात) असा एकूण $११८४४ + रु.८,२५,०००/- हा या लेखाशीर्षाखालील सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याच उपलेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.ए-४,**
**“२०७०-इतर प्रशासनिक सेवा**
**(००) (११४) परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण**
**(००) (०२) विमानचालन सल्लागार, महाराष्ट्र शासन**
**(२०७० ०१५६) ११-प्रवास खर्च**

४. या प्रित्यर्थ उप संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून व संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय विमानचालन संचालनालयाशी संबंधित मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली शक्ती प्रदत्त समितीच्या दि.२५ जून, २०१३ च्या बैठकीतील मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१७०२१३१५१९५४३००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Dilip P. Deshmukh

Digitally signed by Dilip P. Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=89b94ecffd8918a2710a5d1d74df9831b69f2b6f91aaf28f5f7e4afef961baa1, cn=Dilip P. Deshmukh
Date: 2017.02.13 15:22:00 +05'30'

**( दि.प्र.देशमुख )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**सोबत :** परिशिष्ट १

**प्रत माहितीसाठी सादर,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई ५६.
३. उप संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई ५६.
४. महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. महालेखापाल, ( लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. सामान्य प्रशासन विभाग / कार्या.२५, मंत्रालय, मुंबई ३२.
९. निवड नस्ती.

## परिशिष्ट १
## राज्य शासनाच्या हेलिकॉप्टर वरील वैमानिकांच्या CAE, Morris Town, New Jersy, U.S.A. येथील प्रशिक्षणासाठी लागणाऱ्या खर्चाचे विस्तृत विवरणपत्र

| खर्चाची बाब | प्रति वैमानिक खर्च | तीन वैमानिकांच्या प्रशिक्षणाकरीता येणारा एकूण खर्च |
|---|---|---|
| प्रती वैमानिक प्रशिक्षणाचा खर्च | $ १५५०० | $४६५०० |
| प्रती प्रशिक्षणाचा कालावधी | १० दिवस | ३० दिवस |
| टि.एस.ए.फिंगर प्रिंटींगचा कालावधी | ४ दिवस | १२ दिवस |
| प्रवासाचे दिवस | २ दिवस | ६ दिवस |
| प्रती व्हिसा खर्च | व्हिसा प्राप्त | व्हिसा प्राप्त |
| प्रति प्रवास खर्च | रु. २,७५,०००/- अथवा प्रत्यक्ष खर्च (जो कमी असेल तो) | रु.८,२५,०००/- अथवा प्रत्यक्ष खर्च या पैकी जो कमी असेल तो |
| प्रति निवास खर्च | $१८२ प्रति दिवस अथवा प्रत्यक्ष खर्च (जो कमी असेल तो)<br>एकूण दिवस (१०+४) १४<br>१४ X१८२ = $२५४८ | $१८२ प्रति दिवस अथवा प्रत्यक्ष खर्च (जो कमी असेल तो)<br>एकूण दिवस (३०+१२) ४२<br>४२ X१८२ = $७६४४ |
| दैनिक भत्ता खर्च | $ १०० प्रति दिवस<br>(एकूण दिवस १०+४=१४)<br>१४ X१०० = $१४०० | $ १०० प्रति दिवस<br>(एकूण दिवस ३०+१२=४२)<br>४२ X१०० = $४२०० |
| **एकूण खर्च** | **$ १९४४८ + रु.२,७५,०००/-** | **$ ५८३४४ + रु.८,२५,०००/-** |